**व्हिसा कालावधीची मुदत संपुष्टात आल्यानंतर अवैधरित्या भारतात वास्तव्य करीत असलेल्या विदेशी नागरिकांचा शोध घेण्यासाठी राज्यातील इमिग्रेशन चेक पोस्ट (ICPs) करीता टास्क फोर्स गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सीटीझेड-०६२३/प्र.क्र.१८७/विदेशी-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : २४ जुलै २०२३.

**वाचा :-** केंद्रिय गृह मंत्रालय, विदेशी विभाग पत्र क्रमांक – २५०२२/३३/२०२०-F-I, दिनांक: २८.७.२०२०.

**प्रस्तावना :-**

विदेशी नागरीकांच्या व्हिसा कालावधीची मुदत संपुष्टात आल्यानंतर दिनांक ०१ जानेवारी २०११ पूर्वी भारतात अवैधरित्या वास्तव्य करीत असलेल्या विदेशी नागरीकांचा शोध घेण्याची बाब केंद्रिय गृह मंत्रालयाच्या विचाराधीन आहे.

केंद्रिय गृह मंत्रालयाने संदर्भाधीन पत्रान्वये गृह / पोलीस विभागाच्या वरीष्ठ अधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली संबंधित प्रादेशिक विदेशी नागरिक नोंदणी अधिकारी (FRRO) व राज्य पोलीस अधिकाऱ्यांचा राज्यातील इमिग्रेशन चेक पोस्ट (ICPs) करीता टास्क फोर्स (Task Force) गठित करुन राज्यात अवैधरित्या वास्तव्य करीत असलेल्या विदेशी नागरिकांचा शोध घेण्याबाबत कार्यवाही करावी, असे कळविले आहे. त्यास अनुसरुन प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग यांच्या अध्यक्षतेखाली संबंधितांचा टास्क फोर्स गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विदेशी नागरीकांच्या व्हिसा कालावधीची मुदत संपुष्टात आल्यानंतर दिनांक ०१ जानेवारी २०११ पूर्वी भारतात अवैधरित्या वास्तव्य करीत असलेल्या विदेशी नागरीकांचा शोध घेण्यासाठी राज्यातील इमिग्रेशन चेक पोस्ट (ICPs) करीता प्रधान सचिव (विशेष) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे टास्क फोर्स (Task Force) गठित करण्यात येत आहे:

| अ.क्र. | अधिकारी / प्रतिनिधी | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | पोलीस महानिरीक्षक (का. व सु.), पोलीस महासंचालक यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| ३ | आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई | सदस्य |
| ४ | जिल्हा पोलीस अधीक्षक तथा विदेशी नागरिक नोंदणी अधिकारी, (FRO) | सदस्य |
| ५ | उप आयुक्त तथा प्रादेशिक विदेशी नागरिक नोंदणी अधिकारी, मुंबई (FRRO) | सदस्य सचिव |
| ६ | एनआयसी प्रतिनिधी (आयव्हीएफआरटी, राज्य समन्वयक), मुंबई | सदस्य |

(कृ.मा.प.)

२.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०७२४१२२८३५०३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRABHAKAR A BARGAJE

Digitally signed by PRABHAKAR A BARGAJE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=a5459e2e5d5cd2ba6fb1677edb7b0221c7fd440afdac4e64e9cab9edb580546c, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=020BBC4A27428F1BCD33EB5B7AD4B1BC6A96ECAE3CEDA75E05135B9F4C1C5D9A, cn=PRABHAKAR A BARGAJE
Date: 2023.07.24 12:32:25 +05'30'

**( प्र. आ. बारगजे )**
**अवर सचिव, गृह विभाग.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (गृह), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य.
७. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, नवी मुंबई, ठाणे, औरंगाबाद, नाशिक, नागपूर, अमरावती, पुणे, सोलापूर.
८. आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई.
९. पोलिस उप आयुक्त तथा प्रादेशिक विदेशी नागरिक नोंदणी अधिकारी, मुंबई.
१०. सर्व जिल्हा पोलिस अधीक्षक तथा विदेशी नागरिक नोंदणी अधिकारी.
११. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव (अ. व सु.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३. प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (विदेशी-१), गृह विभाग.